**राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत कोरडवाहू क्षेत्रातील कडधान्य व गळितधान्य यांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्यासाठी कृषि यांत्रिकीकरणाची सन २०१०-११ करिता विशेष मोहिम राबविण्याकरीता तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. आयएसओपी -१६१०/प्र.क्र. २५०/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१०**

**वाचा :-**१) कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक ७-३/२०१०/आरकेव्हीवाय, दि. १३/४/२०१०
२) कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक ५-२७/२०१०/एनएफएसएम, दि. २०/८/२०१०
३) शासन निर्णय क्र. राकृवि २०१०/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष, दि. १३/९/२०१०
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृउसं-७/राकृवियो/कृयां/११२१/१०,दि.४/१०/२०१०

**प्रस्तावना :**

कडधान्य व गळितधान्य पिकविणाऱ्या क्षेत्रातील उत्पादन व उत्पादकता वाढविण्यासाठी केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत देशातील साठ हजार गावांमध्ये शेतकऱ्यांना भाडेतत्वावर अवजारे पुरविण्यासाठी कृषि यांत्रिकीकरणाची योजना राबविण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्यातील एकूण १०,२०० गावांमध्ये ही योजना राबवावयाची आहे त्याकरिता १०२० गटांना रु. ५.०० लाख याप्रमाणे १०० टक्के अनुदानावर कृषि अवजारे पुरवावयाची आहेत. याकरिता सन २०१०-११ मध्ये रु. ५१.०० कोटी इतक्या रक्कमेस संदर्भ क्र. १ नुसार मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाचे मार्गदर्शक सूचनांनुसार मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीने दि. १७ ऑगस्ट, २०१० रोजी झालेल्या बैठकीत या योजनेस मंजूरी प्रदान केलेली आहे. या मंजूरीनुसार या प्रकल्पासाठी रु. २५.५० कोटी इतक्या रकमेस संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आलेली आहे. प्रकल्प अंमलबजावणी बाबत कृषि आयुक्तालयाकडून संदर्भ क्र. ४ नुसार प्रस्ताव प्राप्त झाला असून सदरहू योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** राज्यस्तरीय प्रकल्प समितीने दि. १७ ऑगस्ट, २०१० रोजीच्या बैठकीत मान्यता दिल्यानुसार कोरडवाहू क्षेत्रातील कडधान्य व गळितधान्य यांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्यासाठी कृषि यांत्रिकीकरणाची विशेष मोहीम सन २०१०-११ मध्ये राबविण्याकरीता रु.५१.०० कोटी (रुपये एकावन्न कोटी फक्त) इतक्या निधीस तांत्रिक व प्रशासकीय तसेच त्यामधील रु. २५.५० कोटी (रुपये पंचवीस कोटी पन्नास लाख फक्त) या निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेची अंमलबजावणी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून करण्यात येईल. मंजूर केलेला निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी मंजूर केलेला रु.२५.५० कोटी (रुपये पंचवीस कोटी पन्नास लाख फक्त) निधी सन २०१०-११ मध्ये संदर्भाधिन अनु.क्र.३ येथील शासन निर्णयानुसार राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

३ या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय, पुणे यांचे स्तरावरुन निर्गमित करण्यात याव्यात व त्यावेळी शासनाच्या समक्रमांक दि. १६ नोव्हेंबर, २०१० च्या पत्रामधील सूचना विचारात घेण्यात याव्यात. सदर योजनेची अंमलबजावणी मार्गदर्शक सूचनांप्रमाणे होईल याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. या योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या विनियोगाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांच्या स्वाक्षरीने शासनास सादर करण्यात यावे.

४. हा शासन निर्णय मा. प्रधान सचिव (कृषि व फलो.) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून दिला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१०११२०१४४२२१००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( आ.भ. रामटेके )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

कुलगुरु, कृषि विद्यापीठे (सर्व )
आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य,पुणे.
संचालक (वि. व प्र.) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व संचालक/सहसंचालक,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
महालेखापाल ( लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता ), महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद,
जिल्हा कोषागार अधिकारी,सर्व,
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व,
सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी,
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हापरिषद,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, पणन महासंघ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई,
अध्यक्ष, सर्व जिल्हापरिषदा,
माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई-३२
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला मंत्रालयासमोर,
नियोजन विभाग (१४३१)/ वित्त विभाग ( व्यय - १ ) /ग्राम विकास विभाग
सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग (कृषि प्रभाग), मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (राकृवियो कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
निवड नस्ती